**प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत खरीप हंगाम सन २०२१ साठी पिक विमा हप्ता अनुदानापोटी राज्य शासन हिश्याची रु.१६०,३७,९३,७८३/- इतकी रक्कम विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२१/प्र.क्र.१४०/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ मार्च, २०२२.

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.४०/११- अे, दि.२९.०६.२०२० व दि.१७.०७.२०२०.
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.१४.१०.२०२१
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२१/प्र.क्र.१४०/११-अे, दि.२९.०९.२०२१, दि. ६.१२.२०२१ व दि.९.०३.२०२२.
४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र. AIC.MRO / PMFBY-Kharif-२१/१८४०/२२, दि.१०.०१.२०२२.
५. आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्र. सां.८/वि.ह.अनु./१०३८/२०२२, दि.१०.०१.२०२२.

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०२० व रब्बी हंगाम २०२०-२१ पासून तीन वर्षाकरीता दि.२९.०६.२०२० व दि. १७.०७.२०२० च्या शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनी, इफ्को टोकिओ जनरल इंन्शुरन्स कं. लि., रिलायंन्स जनरल इंन्शुरन्स कं. लि., भारती ॲक्सा जनरल इंन्शुरन्स कं. लि., बजाज अलियान्स इंशुरन्स कंपनी लि. व एचडीएफसी इर्गो इंन्शुरन्स कं.लि या ६ विमा कंपन्यांमार्फत राबविण्यात येत आहे. भारतीय कृषि विमा कंपनी ही राज्यात विमा कंपन्यांची समन्वयक कंपनी आहे. भारतीय कृषि विमा कंपनीने प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०२१ अंतर्गत उपरोक्त ६ कंपन्यांचा एकत्रित मिळून पिक विमा हप्ता अनुदानापोटी उर्वरीत राज्य शासन हिस्सा अनुदानाची मागणी केलेली आहे. केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.१.११ नुसार प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत खरीप हंगाम २०२१ ची विमा हप्त्याची राज्य हिस्सा रक्कम विमा कंपन्यांना दि.३१.०३.२०२२ पर्यंत अदा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (५) च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरून

रु.१६०,३७,९३,७८३/- इतकी रक्कम पिक विमा हप्ता राज्य हिस्सा अनुदानापोटी विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतीय कृषि विमा कंपनीने सादर केलेली मागणी, कृषि आयुक्तालयाची शिफारस आणि केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.१.११ या बाबींचा विचार करता, प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०२१ साठी उर्वरीत राज्य हिस्सा पिक विमा हप्ता अनुदान इफ्को टोकीओ जनरल इं. कं. लि. या कंपनीस अदा करण्यासाठी रु.१६०,३७,९३,७८३/- इतका निधी मार्गदर्शक सूचनांमधील मुद्दा क्र.१३.१.५ नुसार भारतीय कृषि विमा कंपनीस वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरची रक्कम खरीप हंगाम २०२१ करीता वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर यापुर्वीच्या इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनां व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयानुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौप. संदर्भ क्र. २५/२०२२/व्यय-१, दि.३१.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१११३२४७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2022.03.28 11:15:41 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१२. उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, नवीन स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
१५. विभागीय व्यवस्थापक, इफ्को टोकीओ जनरल इन्शुरन्स कंपनी, लिमिटेड, ६ वा मजला, सुयोग प्लॅटीनम, मंगलदास रोड, पुणे-४११००१.
१६. निवड नस्ती (कार्यासन ११-अे).